**प्रशासकीय मान्यता-**
**कोपरगांव, जि. अहमदनगर येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर ) यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१२१८/प्र.क्र.७३/का-१३,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ३ डिसेंबर, २०२१.

**पहा :-**१) मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू) ६०६५/१९८९/(१४), दि. २२.१२.२०१७ चे पत्र.
२) जिल्हा न्यायालय, अहमदनगर यांचे क्र.एचकेडब्ल्यु/बीएलडी/११७७६/२०१७, दि. १९.०९.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये कोपरगांव, जि. अहमदनगर येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला होता. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोपरगांव, जि. अहमदनगर येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर ) यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याकरिता रु.१,६६,१७,३००/- (रुपये एक कोटी सहासष्ट लक्ष सतरा हजार तीनशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे .

| अ.क्र | तपशिल | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १ | बांधकाम खर्च | ९६,६३,१००.०० |
| २ | विद्युतीकरण | १०,६२,९४१.०० |
| ३ | पाणी पुरवठा व मल:निस्सारण | ४,८३,१५५.०० |
| ४ | रेन वॉटर हार्वेस्टींग | ९६,६३१.०० |
| ५ | बागबगीचा व सौंदर्यीकरण | १,९३,२६२.०० |
| ६ | वाहन तळ | ५,००,०००.०० |
| ७ | अंतर्गत रस्ते | १०,००,०००.०० |
| ८ | भूविकास | २,५०,०००.०० |
| ९ | पथदिवे | २,००,०००.०० |
| १० | बोअरवेल आणि पाणीपुरवठा | १,५०,०००.०० |
| ११ | अग्नीप्रतिबंधक यंत्रणा | १,००,०००.०० |

| | | |
|---|---|---|
| १२ | संरक्षक भिंत | ८,००,०००.०० |
| १३ | आकस्मिक खर्च (४%) | ३,८६,५२४.०० |
| १४ | संगणकीकरण (२%) | १,९३,२६२.०० |
| १५ | कामगार विमा (१%) | ९६,६३१.०० |
| १६ | विमा (१%) | ९६,६३१.०० |
| १७ | वस्तू व सेवाकर (१२%) | १३,४५,१०३/- |
| | **एकूण रुपये** | **१,६६,१७,२४०/-** |
| | **म्हणजेच एकूण रुपये** | **१,६६,१७,३००/-** |

२. **ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.**

अ) बांधकाम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच बांधकाम सुरु करावे.

ब) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

क) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

ड) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

ई) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

फ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६ गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७००, इतर गृहनिर्माण (०१), न्यायदान-केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा), (०१)(०१) मोठी बांधकामे, ५३-मोठी बांधकामे (कार्यक्रम), (४२१६०२९१) व न्यायदान-केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा), (०३)(०४) मोठी बांधकामे, ५३-मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-५७५/१८/ इमा-२, दि. १५.१२.२०१८ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने व नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा-२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दि. ११ जून, २०१८ अन्वये आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र:- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम,भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला,

उपविभाग-पाच , अनुक्रमांक-१ , महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०३१५०५३५७४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2021.12.03 15:09:10 +05'30'

**(नितिन वि. जिवने)**
**विधि सल्लागार-नि- सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. मा. सभापती विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, अहमदनगर.
६. मा.प्रबंधक (निरीक्षण-२), मा.उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर.
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११.सहाय्यक अभियंता, (श्रेणी-१) सार्वजनिक बांधकाम उपविभाग, कोपरगांव, जि. अहमदनगर.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अहमदनगर.
१३.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४.वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५.नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६.अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१७.महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१८. कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१९.निवड नस्ती/संग्रहार्थ.